शासनाने दिनांक १ ऑगस्ट २०१५ पासून ५० कोटीपेक्षा कमी उलाढाल असलेल्या व्यापा-यांना स्थानिक संस्था करामधून सुट दिल्याने महानगरपालिकांच्या स्थानिक संस्था करापासूनच्या उत्पन्नामध्ये येणारी घट भरून काढण्यासाठी शासनाकडून देण्यात येणारे सहाय्यक अनुदान

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः स्थासंक-२०१५/(प्र.क्र.१३५/२०१५)/नवि-३२
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक: ७ सप्टेंबर, २०१५

वाचा :-

१. शासन अधिसुचना स्थासंक२०१५/प्र.क्र.४७/२०१५ नवि-३२,दि.०१.०८.२०१५.
२. शासन परिपत्रक नगरविकास विभाग क्र .बीयुडी/१४१५ प्र.क्र./१४३/नवि-४, दिनांक ०४.०८.२०१५.
३. शासन निर्णय स्थासंक/२०१५-प्र.क्र१३५/२०१५ /नवि-३२, दिनांक ०४.०८.२०१५.
४. शासन निर्णय स्थासंक/२०१५-प्र.क्र१३५/२०१५ /नवि-३२, दिनांक १४.०८.२०१५.

प्रस्तावना :-

शासनाने दिनांक ०१ ऑगस्ट २०१५ पासून ५० कोटी पेक्षा कमी आर्थिक उलाढाल असलेल्या सर्व व्यापा-यांना स्थानिक संस्था कर भरण्यापासून सूट देण्याचा निर्णय घेतला आहे. यामुळे महानगरपालिकांच्या उत्पन्नामध्ये येणारी तुट भरूण काढण्यासाठी महानगरपालिकांना यापुढे १% मुद्रांक शुल्क अधिभारापासून प्राप्त होणारे उत्पन्न, त्याचबरोबर ५० कोटीपेक्षा जास्त उलाढाल असलेल्या व्यापा-यांकडून महानगरपालिकांना प्राप्त होणारे स्थानिक संस्था करापासूनचे उत्पन्न हा पर्यायी स्त्रोत उपलब्ध असणार आहे. तसेच या पर्यायी स्त्रोतापासून प्राप्त होणारे उत्पन्न व सन २०१५-१६ मध्ये महानगरपालिकांना प्राप्त होणारे स्थानिक संस्था करा पासूनचे संभाव्य उत्पन्न यामध्ये येणारी तूट शासनाकडून अनुदानाच्या स्वरूपात महानगरपालिकांना देण्यात येणार आहे.

सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी वित्त विभागाने ऑगस्ट २०१५ ते डिसेंबर २०१५ या ५ महिन्याच्या कालावधीसाठी महानरगपालिकांना सहाय्यक अनुदान उपलब्ध करून देण्यासाठी रू.२०९८.४० कोटीची तरतूद पूरक मागणीद्वारे उपलब्ध करून दिली आहे. दिनांक १ ऑगस्ट २०१५ पासून शासनाच्या स्थानिक संस्था कराच्या नवीन धोरणाची अंमलबजावणी सुरू झाली असल्याने आत्ता महानगरपालिकांना त्यांचा दैनंदिन खर्च भागविण्यासाठी आक्टोंबर, २०१५ साठी खालील प्रमाणे अनुदान वितरीत करणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय :-**

२५ महानगरपालिकांना माहे- आक्टोंबर २०१५ या महिन्यातील स्थानिक संस्था कराची तूट भरून काढण्यासाठी रक्कम रूपये ४१९.६९ कोटी (रू. चारशे एकोणीस कोटी एकोणसत्तर लाख फक्त.) खालील प्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

**सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील आक्टोंबर २०१५ महिन्याकरीता वाटप करावयाचा महानगरपालिका निहाय्य निधी**

| अ.क्र. | महानगरपालिकेचे नांव | माहे आक्टोंबर २०१५ मधील वितरीत करावयाचे अनुदान (रक्कम रू. कोटीत) |
|---|---|---|
| १ | मिरा-भाईंदर | १२.२७ |
| २ | जळगाव | ५.७९ |
| ३ | नांदेड-वाघाळा | ३.७० |
| ४ | वसई-विरार | १५.९४ |
| ५ | सोलापूर | १२.३७ |
| ६ | कोल्हापूर | ६.४३ |
| ७ | औरंगाबाद | ११.५७ |
| ८ | अहमदनगर | ५.३८ |
| ९ | उल्हासनगर | १०.११ |
| १० | अमरावती | ७.१४ |
| ११ | कल्याण-डोंबिवली | १०.६६ |
| १२ | चंद्रपूर | ३.४४ |
| १३ | परभणी | १.० |
| १४ | लातूर | ०.९१ |
| १५ | पुणे | ८१.४१ |
| १६ | पिंपरी-चिंचवड | ६६.४८ |
| १७ | नागपूर | ३०.९८ |
| १८ | ठाणे | ३५.७४ |
| १९ | नवी मुंबई | ११.५४ |
| २० | सांगली | ७.७५ |
| २१ | भिवंडी-निजामपूर | १४.६५ |
| २२ | मालेगाव | ८.७३ |
| २३ | नाशिक | ४५.८५ |
| २४ | धुळे | ५.६३ |
| २५ | अकोला | ४.२२ |
| **एकुण** | | **४१९.६९** |

२. याकरीता उप सचिव, (नवि-५) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच कक्ष अधिकारी, (नवि-५) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. याकरीता होणारा खर्च "मागणी क्र.एफ -४ ३६०४ स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहंस्तांकित रकमा देणे २००, इतर संकीर्ण नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा, (००) (०९) स्थानिक संस्था कराच्या बदल्यात महानगरपालिकांना सहायक अनुदान (एलबीटी) (३६०४०९४२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१५-१६ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक. ३७७ /व्यय- ३ ,
दि. १९. ०८. २०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सांकेस्तळावर उपलब्द करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०९०७१२३३१५००२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Govind Lokhande

Digitally signed by Govind Lokhande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ce89373fc7a728d2cdfa1a26c08e1e3f7e3f4f232c1bd146794d3cc3034d5701, cn=Govind Lokhande
Date: 2015.09.07 12:38:03 +05'30'

**(गो. आ. लोखंडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त तथा संचालक नगरपरिषद संचालनालय ,वरळी ,मुंबई.
३. संबंधित जिल्हाधिकारी.
४. आयुक्त संबंधित महानगरपालिका.
५. महालेखापाल ,महाराष्ट्र) २/१-लेखा व अनुज्ञेयता) (मुंबई/नागपूर)
६. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
८. संबंधित जिल्ह्याचे जिल्हा कोषागार अधिकारी.
९. वित्त विभाग/व्यय-३ /अर्थ-१६/आर्थोपाय, मंत्रालय, मुंबई ,
१०.मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
११.मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव,
१२.नगर विकास विभाग/कार्यासन-नवि-४, मंत्रालय, मुंबई-३२,
१३.कार्यासन नवि-३२ निवड नस्ती